(8)

GR-20040722121418001-0300

महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ च्या कलम २(४२) मधील तरतुदीनुसार घोषित केलेली नागरी क्षेत्रे रद्द करणे व येथून पुढे नव्याने नागरी क्षेत्र घोषित न करण्याबाबत...

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक:एनएए ३८०२/प्र.क्र.२१/ल-५,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ४ सप्टेंबर,२००३.

पहा:- महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६, कलम २(४२).

शासन निर्णय:-

राज्यातील सर्व महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदा वगळता, राज्यात महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६, च्या कलम २ (४२) मधील तरतुदीं नुसार घोषित केलेली सर्व "नागरी क्षेत्रे" नागरी क्षेत्रे घोषित करण्यापूर्वी वर्ग-१ व वर्ग-२ ची महसूली गांवे होती. वर्ग-१ व वर्ग-२ च्या गावांतील अकृषिक आकारणीचे प्रमाणदर हे अनुक्रमे २ पैसे व १ पैसा प्रती चौ.मी. होते. पुढे ही गांवे "नागरी क्षेत्र" म्हणून अधिसूचित झाल्यानंतर, या नागरी क्षेत्राचे अकृषिक आकारणीचे प्रमाणदरात वाढ झाली. तथापि,"नागरी क्षेत्र" म्हणून अधिसूचित केले तरी ही गांवे संबंधित जिल्हा परिषदा व ग्राम पंचायतीच्या कार्यक्षेत्रात येत असल्यामुळे, या नागरी क्षेत्रातील अकृषिक आकारणीवर "महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समिती अधिनियम १९६१" मधील तरतूदीनुसार सातपटींपर्यंत जिल्हा परिषद उपकर आणि "मुंबई ग्रामपंचायत अधिनियम, १९५८" मधील तरतूदीनुसार दोनपटीपर्यंत ग्रामपंचायत उपकर आकारला जातो. त्यामुळे या नागरी क्षेत्रातील अकृषिक आकारणी ग्रामिण भागातील अकृषिक आकारणीपेक्षा साधारणत: ९ पटीने वाढल्याचे आढळते. तसेच काही ठिकाणी महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषद क्षेत्रातील अकृषिक आकारणीपेक्षाही या घोषीत नागरी क्षेत्रातील अकृषिक आकारणी जास्त झाल्याचे आढळते. घोषीत नागरी क्षेत्रातील या अकृषिक आकारणीच्या वाढीबाबत राज्यातील जनता तसेच लोकप्रतिनिधींकडून मोठया प्रमाणात विरोध होत होता. तसेच "महाराष्ट्र जमीन महसुल अधिनियम,१९६६" च्या कलम ११३ नुसार शासनाने दि.१/८/२००१ पासून अकृषिक आकारणीच्या प्रमाणदरात सुधारणा केल्यामुळेही या घोषीत नागरी क्षेत्रातील अकृषिक आकारणीमध्ये अवाजवी वाढ झाल्याबाबतही शासनाकडे तक्रारी प्राप्त झाल्याने, या सर्व बाबींचा साकल्याने विचार करुन शासनाने असा निर्णय घेतला आहे की, राज्यातील महानगरपालिका/नगरपालिका/नगरपरिषदा क्षेत्र वगळता, महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ च्या कलम २ (४२) मधील तरतुदीनुसार राज्यातील

ग्रामीण भागात घोषित केलेली सर्व "नागरी क्षेत्रे" रद्द करण्यात येत आहेत व येथून पुढे नव्याने "नागरी क्षेत्र" घोषित करण्यात येऊ नयेत (सोबत अधिनियमाची प्रत जोडली आहे)

२. हा निर्णय दि.१/८/२००३ पासून अंमलात येईल.

३. उक्त निर्णयाच्या अनुषंगाने

(अ) महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ च्या कलम २ (४२) मधील तरतुदीनुसार दिनांक ३१/७/२००३ पर्यंत राज्यात वेळोवेळी घोषित केलेली महानगरपालिका/नगरपालिका क्षेत्र वगळता इतर सर्व "नागरी क्षेत्रे" रद्द होतील व दिनांक १/८/२००३ पासून ती गावं वर्ग-१ ची मानली जातील,

(ब) दिनांक ३१/७/२००३ पूर्वी अधिसूचित केलेल्या नागरी क्षेत्रांतील दिनांक ३१/७/२००३ पर्यंत निर्धारीत करण्यात आलेली अकृषिक आकारणी आणि उपार्जन करपात्र व्यक्तीस भरणे बंधनकारक राहील.

(क) दिनांक ३१/७/२००३ पूर्वी अधिसूचित केलेल्या नागरी क्षेत्रात दिनांक ३१/७/२००३ पर्यंत बसवलेला आणि भरणा केलेला कोणताही अकृषिक कर व तदनुषंगीक उपकर परत केला जाणार नाही.

४. महाराष्ट्र जमीन महसूल अधिनियम १९६६ च्या कलम २ (४२) अन्वये अधिसूचित केलेल्या नागरी क्षेत्रांतील अकृषिक आकारणीच्या वसूलीस शासनपत्र क्रमांक एनएए ३८०२/प्र.क्र.३०९/ल-५, दिनांक ७/४/२००३ अन्वये दिलेली स्थगिती उठविण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत:वरीलप्रमाणे

प्रकाबर्वे

( प्रकाश का.बर्वे )
अवर सचिव
महसूल व वन विभाग.

प्रत:- १) सर्व विभागीय आयुक्त,
२) सर्व जिल्हाधिकारी
३) सर्व तहसिलदार
४) सर्व मंत्रालयीन विभाग,
५) वित्त विभाग (व्यय-९ कार्यासन)
६) महालेखापाल-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
७) नोंदणी महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे
८) जमाबंदी आयुक्त व संचालक भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे
९) मुद्रांक अधिक्षक, मुंबई
१०) महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
११) निवड नस्ती, ल-५ कार्यासन, महसूल व वन विभाग.